औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ मध्ये प्रस्तावित केलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने प्राप्त निवेदने/तक्रारी यांच्या अनुषंगाने सर्वसंबंधितांची बैठक घेऊन अहवाल तयार करण्यासाठी गठित त्रिपक्षीय समितीस मुदतवाढ देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

उद्योग,उर्जा व कामगार विभाग

शासन निर्णय क्रमांक: औविअ -११२०१४ /प्र.क्र.१३१ /कामगार-२

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक- ११ सप्टेंबर, २०१८.

वाचा:- शासन निर्णय समक्रमांक दि.६ मार्च, २०१८ व दि. १८.०६.२०१८.

**प्रस्तावना-**

शासन निर्णय दि.६ मार्च, २०१८ अन्वये औद्योगिक विवाद अधिनियम ,१९४७ मध्ये प्रस्तावित करण्यात आलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने शासनस्तरावर तसेच कामगार आयुक्त, मुंबई यांचेकडे विविध कामगार संघटना यांचेकडून प्राप्त झालेली निवेदने/तक्रारी यांचे निराकरण करण्याच्या अनुषंगाने संबंधितांसमवेत बैठका आयोजित करुन त्याबाबतचा अंतिम अहवाल शासनास सादर करण्याकरीता मा.मंत्री (कामगार) यांच्या अध्यक्षतेखाली एक त्रिपक्षीय समिती गठित करण्यात आली आहे. सदरहू त्रिपक्षीय समितीस दिनांक ६ जून, २०१८ पासून पुढील ३ महिन्यांसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. सदरहू त्रिपक्षीय समितीस दि. ०५.०९.२०१८ पासून आणखी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ च्या कलम २ए,कलम २५ एफ (बी) ,कलम २५ के (१)व(१ए),कलम २५ एन (१)(बी),कलम २५ एन(९) व कलम २५ ओ(८) मध्ये प्रस्तावित करण्यात आलेल्या सुधारणांच्या अनुषंगाने प्राप्त झालेली/होणारी विविध कामगार संघटना तसेच कंपनी व्यवस्थापन यांची निवेदने/तक्रारी विचारात घेऊन, सदरहू तक्रारींचे निराकरण करण्यासाठी सर्व संबंधितांसमवेत बैठका आयोजित करुन व त्याबाबतचा अंतिम अहवाल शासनास सादर करण्याकरीता मा.मंत्री (कामगार) यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०६.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आलेल्या त्रिपक्षीय समितीस दिनांक ०५.०९.२०१८ पासून पुढील ३ महिन्यांची मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदरहू त्रिपक्षीय समितीने उक्त अधिनियमात प्रस्तावित केलेल्या सुधारणांबाबत प्राप्त झालेली/होणारी विविध निवेदने/तक्रारी विचारात घेऊन सर्व संबंधितांसमवेत बैठका घेऊन, त्याबाबतचा अंतिम अहवाल शासनास विहित मुदतीत सादर करावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१८०९१११४४५०८२६१० असा आहे. सदरचा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1e08bc9f719f8ce54a66aed8ed2a521ee2d571facec17b204b286a31e88c58d9, serialNumber=65054d119a082276260f8a89874fd83d0d6d6a635cf1aef6e1c9b580caacc3b0, cn=Rajesh Kumar
Date: 2018.09.15 15:53:46 +05'30'

**( राजेश कुमार )**
**प्रधान सचिव (कामगार)**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
२. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
३. मा.राज्यमंत्री (कामगार) खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
४. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक
५. कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य मुंबई
६. उपसचिव (कामगार) ,उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
७. निवड नस्ती (कामगार-२)